**सन २०२१-२२ वन कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण (४४१५-०१५४) राज्य योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.०२/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- ०६ जानेवारी, २०२२**

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१
४. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.७८/३१८/२०२१-२२, दिनांक ०८.११.२०२१

प्रस्तावना :-

सन २०२१-२२ वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (४४१५ ०१५४) या राज्य योजनेकरिता रु.१५०.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वित्त विभागाचे संदर्भ क्र.१,२ व ३ चे परिपत्रक व शासन निर्णयानुसार सदर योजनेंतर्गत ६०% च्या मर्यादेत रु.५०.०० लक्ष इतका नियतव्यय दर्शविण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१, २ व ३ चे परिपत्रक व शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी (डिसेंबर, २०२१ पर्यंत) अनिवार्य खर्चाच्या निधी वितरण/खर्चाची मर्यादा ७५% इतकी विहीत करण्यात येत आहे. मात्र २१-पुरवठा व सामग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर), ३२-अशंदाने व ३३-अर्थसहाय्य या बाबींसाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील. तसेच कार्यक्रम खर्चासाठी ५०% इतक्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. मात्र कार्यक्रम खर्चाची वर्ष अखेरची मर्यादा ६०% इतकीच राहील, असे नमूद केले आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.४ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), म.रा.पुणे यांचे कामाकरीता प्रस्तावित रु.५०.०० लक्ष निधी मागणीचा प्रस्ताव प्राप्त झाला असून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१,२ व ३ येथील परिपत्रक व शासन निर्णय विचारात घेता, वन कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (४४१५ ०१५४) या योजनेंमधून सन २०२१-२२ आर्थिक वर्षा करीता **१३-कार्यालयीन खर्च- रु.१५.०० लक्ष व ५०-इतर खर्च- रु.३५.०० लक्ष असा एकूण रु.५०.०० लक्ष इतका निधी** खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०.सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ परिपत्रक व शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५-कृषी संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६-वनीकरण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजनाअंतर्गत यांजना २७७ शिक्षण (००)(०३) वन कर्मचा-यांना प्रशिक्षण (राज्य) (४४१५-०१५४) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मध्ये उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ परिपत्रक व शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०६१२३४१२७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2022.01.06 12:38:33 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक(संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), म.रा.पुणे
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)